**अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१४-१५, शासनाकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या कर्मचा-यांच्या निवृत्ती वेतनाची वर्गणी म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सहाय्यक अनुदान (२२१५ १६३८) (३१) सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.१११/पापु-२३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३० मार्च २०१५

वाचा :-

**१) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/ प्र. क्र. १११/ पापु-२३ दिनांक ५ जुलै, २०१४**

**प्रस्तावना :-**

शासनाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेले परिसर अभियांत्रिकी मंडळाचे सर्व कर्मचारी/अधिकारी सन १९७९ मध्ये महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनि:सारण मंडळ स्थापन झाल्यानंतर शासनाकडून मंडळाकडे वर्ग करण्यात आलेत. सदर कर्मचा-यांच्या शासनाकडील सेवेच्या दायित्वासंबंधी निवृत्तीवेतन व निवृत्तीविषयक इतर लाभ अदा करण्यासाठी प्राधिकरणास (२२१५ १६३८) या लेखाशिर्षाखाली शासनाकडून अनुदान देय आहे. सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी या प्रयोजनार्थ रु.३,६३,००,०००/- (रु. तीन कोटी, त्रेसष्ट लक्ष फक्त) एवढी मूळ तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदरहू तरतूदीपैकी रु.१,२१,००,०००/- इतकी रक्कम उपरोक्त दिनांक ५ जुलै, २०१४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला रोखीने मुक्त करण्यात आली आहे. आता उर्वरित रु.१,८७,५५,०००/- इतकी रक्कम रोखीने मुक्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता १९९ इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१) (०३) म.जी.प्रा.कडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्ती वेतनाची वर्गणी म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सहाय्यक अनुदान (२२१५ १६३८) (३१) सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली" रु.१,८७,५५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, सत्याऐंशी लक्ष, पंचावन्न हजार फक्त) एवढी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सदस्य सचिवांना रोख मंजूर करण्यास शासन या आदेशान्वये मान्यता देत आहे.

२. या आदेशाद्वारे मंजूर केलेली रक्कम रु. १,८७,५५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, सत्याऐंशी लक्ष, पंचावन्न हजार फक्त)प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), (श्री. सुधाकर डांगे) यांचे सहीने तयार केलेले व उपसचिव, (श्री. शां. सि. कुदळे) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत

केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करावे. सदरहू रक्कम इसीएस प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यांत यावी.

३. हे देयक प्रतिस्वाक्षरीत करण्यासाठी उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. सदर निधी मासिक विवरणपत्रानुसार उपलब्ध आहे.

४. मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ नुसार महालेखाकार, मुंबई यांच्याकडे त्यांच्या मागणीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रासह निरीक्षणाकरीता सादर केले पाहिजेत.

५. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई यांनी उक्त रक्कम "मागणी क्रमांक वाय-२,२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता १९९-इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१) इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१) (०३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्ती वेतनाची वर्गणी म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सहाय्यक अनुदान (२२१५ १६३८) (३१) सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून, सन २०१४-२०१५ मधील वित्तीय लेख्यात समाविष्ट करावी. "

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८६/व्यय-३, दिनांक २५ मार्च, २०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१०५६३८१८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.03.30 19:31:46 +05'30'

**गौरी. रा. म्हस्के**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालये, वांद्रे, मुंबई

९. कक्ष अधिकारी, कार्यायन क्र.अर्थ-१९ व व्यय-३ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कक्ष अधिकारी, (कार्यासन क्र.१४११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. अवर सचिव, कार्यासन क्रमांक - ०४ व २०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती पापु-२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई